**विभागीय आयुक्त यांच्या आस्थापनेवरील ३६**
**अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एमसीओ-२०१९/प्र.क्र.४३/नवि-१४**
मंत्रालय, मुख्य इमारत, ४ था मजला,
हुतात्मा राजगुरु चौक,
मादाम कामा मार्ग, मुंबई ४०० ०३२,
दिनांक ०९ ऑक्टोबर, २०१९.

वाचा :-

१) शासन निर्णय क्रमांकः महसूल व वन विभाग क्र.ईएसटी-२२०३/प्र.क्र.४३/ई-८, दि.०१.१०.२००५ व शुध्दीपत्रक समक्रमांक दि. १५.०२.२००६
२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.पदनि-२०१५/प्र.क्र.५/१५/वित्तीय सुधारणा-१, दि.२०.०२.२०१५.
३) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/वित्तीय सुधारणा-१, दि.११.०२.२०१६
४) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/वित्तीय सुधारणा-१, दि.२१.०९.२०१६
५) शासन निर्णय, नगर विकास विभाग क्र. एमसीओ-२०१९/प्र.क्र.४३/नवि-१४, दि.११.०३.२०१९.
६) आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय यांचे पत्र क्र.नपप्रसं/आस्था/ आकृतिबंध/ २०१९/कक्ष-१/२९४४, दि.२४.०९.२०१९.
७) शासन निर्णय, वित्त विभाग क्र. पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.११.०९.२०१९.

प्रस्तावना:-

महसूल व वन विभागाच्या अ.क्र.१ येथील आदेशान्वये विभागीय आयुक्त कोकण, पुणे, नागपूर, नाशिक, औरंगाबाद व अमरावती यांच्या आस्थापनेवरील नगरपालिका प्रशासन कामकाज करण्यासाठी निर्माण केलेली ३६ पदे या विभागाकडे वर्ग करण्यात आलेली आहेत. सदर पदांपैकी ३६ पदांना संदर्भ क्र.६ च्या शासन निर्णयान्वये दि.०१.०३.२०१९ ते दि.३०.०९.२०१९ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती. आता संदर्भ क्र.७ येथील वित्त विभागाच्या दि.११.०९.२०१९ च्या शासन निर्णयान्वये वित्त विभागाने प्रशासकीय विभागास दिलेल्या अधिकारात व सदर शासन निर्णयातील अटीच्या अधीन राहून विभागीय आयुक्त यांच्या आस्थापनेतील कार्यरत ३६ अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय:-**

आता, विभागीय आयुक्त, कोकण, नाशिक, पुणे, औरंगाबाद, अमरावती व नागपूर यांच्या मागणीनुसार व त्या अनुषंगाने नगरपरिषद प्रशासन संचालनालयाने सादर केलेल्या प्रस्तावानुसार, खालील ३६ अस्थायी पदांना वित्त विभागाच्या दि.११.०९.२०१९ च्या शासन निर्णयानुसार कार्यवाही करण्याच्या अटींच्या आधीन राहून दि.०१.१०.२०१९ ते दि.२९.०२.२०२० अथवा संचालनालयाच्या सुधारित आकृतीबंधानुसार प्रत्यक्ष कार्यवाही पूर्ण होणे यापैकी आधी येणारा दिनांक या कालावधीसाठी मुदतवाढ देण्यात येत आहे:-

| अ.क्र. | विभागीय आयुक्त | एकुण पद संख्या | नगरपालिका प्रशासनासाठी कार्यरत असलेली पदे | मुदतवाढ देण्याचे प्रस्तावित असलेली पदे |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | कोकण | ५ | तहसलिदार-१, अव्वल कारकुन-३, लिपिक- टंकलेखक-१ | शासन निर्णय, महसुल व वन विभाग क्र. ईएसटी-२२०३/ प्र. क्र. ४३/ई-८, दि.०१.१०.२००५. |
| २ | नाशिक | १० | सहायक संचालक-१, टाऊन प्लॅनर-१, मुख्य लेखापाल -१, नियोजन सहायक -१, निरीक्षक -१, मुख्याधिकारी-१, अव्वल कारकुन-४ | वरीलप्रमाणे |
| ३ | पुणे | ३ | तहसिलदार-१, अव्वल कारकुन-१, लिपिक- टंकलेखक - १ | वरीलप्रमाणे |
| ४ | औरंगाबाद | ६ | तहसिलदार-१,अव्वल कारकून-४, लिपिक- टंकलेखक -१ | वरीलप्रमाणे |
| ५ | अमरावती | ७ | सहायक संचालक-१, मुख्यलेखापाल-३, नियोजन सहायक-१, महानिरीक्षक-१, उपलेखापाल-१ | वरीलप्रमाणे |
| ६ | नागपूर | ५ | अव्वल कारकुन-४, लिपिक- टंकलेखक -१ | वरीलप्रमाणे |
| | एकुण | **३६** | | |

३. सर्व विभागीय आयुक्त तथा प्रादेशिक संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय यांनी उपरोक्त ३६ पदांचे वेतन भत्ते यावर होणारा खर्च सन २०१९-२० साठी मागणी क्र. एफ-२, मुख्य लेखाशिर्ष २२१७- नगर विकास ८० सर्वसाधारण-००१, संचालनालय प्रशासन (००) (०१) संचालक नगरपरिषद प्रशासन (२२१७००४७) ०१ वेतन या लेखाशिर्षाखालील मंजुर तरतूदीतुन भागविण्यात यावा.

४. शासन निर्णय वित्त विभाग क्र. पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.११.०९.२०१९अन्वये प्रशासकीय विभागांना देण्यात आलेल्या प्राधिकारानुसार हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९१००९१५३६३९९२२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sanjay S Gokhale

Digitally signed by Sanjay S Gokhale
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Urban Development, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ab8a7eeedad158d24cf530f0d6b662808245be49a8459ed4c63961ebdc3cb961, cn=Sanjay S Gokhale
Date: 2019.10.09 15:44:19 +05'30'

**(सं.श.गोखले)**

**सह सचिव**

**प्रत,**

१. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई.

२. विभागीय आयुक्त तथा प्रादेशिक संचालक, सर्व विभाग
३. जिल्हाधिकारी, सर्व
४. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
५. महालेखापाल-महाराष्ट्र ½ (लेखा परिक्षा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर
६. महालेखापाल (लेखा परिक्षा) मुंबई /नागपूर
७. वित्त विभाग, अर्थसंकल्प-३, व्यय -३, मंत्रालय, मुंबई-३२
८. कार्यासन - ई-८, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
९. मुख्याधिकारी, नगर परिषदा (सर्व)
१०. स्वीय सहायक, प्रधान सचिव (नवि-२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई -३२
११. कार्यासन अधिकारी नवि-१५,१६,१७,१८,१९,२०,२४,२७ नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१२. निवडनस्ती (नवि-१४)